ई-साहित्य प्रकाशन

# शब्दअक्षरी


**संपादक**

सोनाली घाटपांडे (पुणे)

**अतिथी संपादक**

सौ. जयश्री अंबासकर (कुवेत)

**सह संपादक**

भारती सरमळकर (मुंबई)

स्वप्ना कोल्हे (नाशिक)

सचिन काकडे (मुंबई)

**“बालपण”** या जगातली सर्वात सुंदर आठवण......बालपण म्हटल की आट्यापाट्या, हुतुतु पासून अगदी व्हीडिओगेम पर्यंत सर्व विषय आठवतात. शाळेत केलेला दंगा, सुटीत केलेली मस्ती अणि शेवटी त्याबद्दल खाल्लेला मार . सगळ काही अगदी स्पष्ट स्पष्ट आठवत, कारण ते दिवस असतातच तसे सोनेरी .

‘बालपणीचा काळ सुखाचा’ असं उगाच नाही म्हणत. ते असत एक गारूड, एक निर्व्याज्य आयुष्य जिथे कसलीच पर्वा किंवा खोटेपणा नसतो, अभिमान अथवा जगण्याची लढाईही नसते . अशाच काही कविता घेऊन आम्ही आपल्यासमोर येत आहोत ............... बालपणीच्या आठवणी जागवण्यासाठी .

चला तर मग अनुभवूया त्या बालपणातली चटकदार चिंचांची गंमत , गोड गोड गोळ्याची चव आणि खेळातली मज्जा आतिथी संपादिका सौ. जयश्री अंबासकर यांच्या सोबत

**आतिथी संपादिका :**



सौ. जयश्री अंबासकर या मुळच्या नागपूरच्या, आई वडीलांच्या प्रोत्साहनामुळे लहानपणापासूनच

खेळ, नाट्क, गाण याच शिक्षण घेतलं. त्यानंतर ‘बालविहार’, ‘युववाणी’ अशा कार्यक्रमातून सहभाग.

लग्नानंतर मुंबई येथे नाटक, स्पर्धा , गाणी हे सुरूच राहिल. यातच मुंबई दुरदर्शनवर काम करण्याची संधी मिळाली.

कुवेतमध्ये गेल्यानंतर तर याला अजूनच बहर आला असे म्हणता येईल.

कुवेतच्या महाराष्ट्र मंडळा बरोबर काम करतानाच त्यांनी स्वतःची सीडी देखील काढली.

जयश्रीताईंनी आत्तापर्यंत अनेक सीडीजसाठी गीतलेखन केले आहे , तसेच एका सीडीसाठी वाचन केले आहे.

अनेक प्रसिध्द गायकांनी त्यांची गीते गायली आहेत. कुवेतच्या अस्मिता गीताचे लेखनही त्यांनी केले आहे.

**आतिथी संपादिकेच्या लेखणीतून :**

संध्याकाळी सहज बागेत फिरायला गेले , वाटलं फुलांच्या दरवळासोबत लहान मुलांचाही सहवास मिळेल. त्यांच ते बागडणं, निरागस हसू, बिनधास्तपणा आणि त्यांची आनंदी हासरी दुनिया अनुभवायला मिळेल पण कसच काय !!

बागेत मुलांपेक्षा म्हातारी माणसचं जास्त दिसली. कडेवरची आणि प्रॅममधली मुल सोडली तर बागेत अतिशय तुरळक मुलं दिसत होती.

आश्चर्याबरोबर वाईटही वाटलं, आजकाल या मुलांना बागडायला वेळ असतोच कुठे? घड्याळयाच्या काट्याला बांधलेल्या आयुष्याबरोबर ही मुलंही भरडली जातायत. आई-बाबा नोकरी करणार आणि मुलांना पाळणा घरातल्या बायका वाढवणार ! संध्याकाळी घरी येत नाहीतो त्यांचे क्लासेस. अगदी २-३ व र्षापासून त्यांच करियर प्लान केल जात.

बालपण म्हणजे आयुष्यातला सर्वात सुंदर काळ, ना काळजी ना चिंता !! “रम्य ते बालपण” म्हटलय ते उगाचं नाही.

बालपण म्हणजे फक्त मज्जा असचं समीकरण होतं आमच्या बालपणी. सकाळी ऊठून आईबरोबर फिरायला जायचं, येताना देवाला फुलं तोडून आणायची, आईने केलेलं खमंग खायच आणि थोडाफार अभ्यास मग काय पूर्ण दिवस मजाच ! शाळेत सुध्दा अभ्यास जास्त नव्हता, गाणी , नाच, बागकाम , खेळ, कवायती. शिवाय शाळेतले बाई आणि सरसुध्दा अगदी जवळचे, मित्रमैत्रिणी ही अगदी जीवाभावाचे. थोडावेळ कट्टीबट्टी व्हायची पण इतरवेळी अगदी गळयात- गळे.

मधल्या सुटीत मैत्रीणीचा डबा हक्काने खायचा. शाळेबाहेरच्या आजीकडून उकडलेली बोरं घेऊन एकमेकांना चिडवत खायची. ज्याची सर्वात शेवटी संपतील तो सगळयात खुष. शाळा सुटली की सायकलवर टांग मारून घरी. मग आवरून, काहीतरी खाऊन परत सगळे जमणार आणि पुन्हा धमाल!

किती तरी वेगवेगळे खेळ खेळायचे .... सुरकांडी , डब्बा ऐसपैस , लंगडी, लगोरी चालू असायचे अगदी दिवेलागणीची वेळ होईपर्यंत मग घरी येऊन परवचा, अभ्यास, जेवणं आणि झोप. किती छान जायचा दिवस.

उन्हाळयाच्या सुटीतली धमाल तर विचारायलाच नको. सगळी भावंड एकत्र यायची, दोनवेळा पोटोबा झाला की हुंदडायला मोकळे. आजच्या मुलांच बालपण पाहिलं की त्यांची दया येते. त्याच बालपणच हरवून गेलयं. स्पर्धा, स्वतःला प्रत्येक ठिकाणी सिध्द कराव लागण याने त्यांना कोणत्याच गोष्टीचा निर्भेळ आनंद मिळू शकत नाही. आई-वडील सुध्दा स्वतःला न करता आलेल्या गोष्टी मुलांकडून अट्टाहासाने करून घेतात. टीव्ही, संगणक, मोबाईल यामुळे एकत्र खेळणं, भेटीगाठी जवळपास बंदच झाल्यात. अभ्यासाच ओझं वाढलय ते वेगळचं. "लहानपण देगा देवा" म्हणताना एका नव्या पिढ़ीचे पालक म्हणून आई - वडीलांनी स्वतः होऊन काही करायचा प्रयत्न केला तर येणा-या पिढ्या त्यांच्या ॠणी होतील. पैसा, सत्ता यांच्या मागे पळताना आपली गती थोडी कमी केली तर मुलांना वेळ देता येईल, चांगले संस्कार देता येतील. पाळणाघरापेक्षा आजी - आजोबां बरोबर मुलं चांगली फुलतील. नव्या पिढ़ीच बालपण हरवत चाललय ह्याला आपण तर जबाबदार नाही ना? याचा थोडा विचार सर्वांनी केला आणि कृती केली तर आपण त्यांच बालपण नक्की परत देऊ शकू.



## ~~ छत्रीखालच बालपण ~~

मुसळधार पावसात

खिडकीसमोर बसून

आठवणींचे कण गोळा करताना

हम खास सापडणारा एक कण

म्हणजे आपल 'छत्रीखालच' बालपण

पावसाळ्यात रोज सकाळी

शाळेत जायची इच्छा नसतानाही

आ जोबांची जड काळी छत्री घेऊन

चिखलातून वाट काढत जात

छोट्या रंगीबेरंगी छत्र्यांमध्ये

दप्तराच्या ओझ्यासोबत

छत्रीची वेगळी पिशवी वागवणारं

आणि वर्गाबाहेर ठेवल्यामुळे

वेंधळ्यासारखी छत्री विसरल्यावर

आईचा मार खायला लावणारं

आपल ' भिजलेल' बालपण

खूप पाऊस पडल्याने

शाळेला सुटी मिळाली

तर लपाछपी खेळताना

तीच काळी छत्री उघडून

त्यामागे बिनधास्त लपणारं

आपल 'खट्याळ' बालपण



- **नितीन मुळे**

## ~~ दिवस सुखाचे ~~



पिल्ला पिल्ला कुणा न चुकले
कधीच मोठे होणे
थांब ज रा घे समजून तराणे !

पिल्ला पिल्ला ऐकून घे रे
किल बिल किलबिल गाणे
झुळझुळ झुळझुळ वाहणे !

पिल्ला पिल्ला चाखून घे रे
चोचीत भरवले दाणे
गोष्टीत गुंफले उखाणे !

पिल्ला पिल्ला सजवून घे रे
ओठी जीवन तराणे !
कळी खळीत फुलणे !

पिल्ला पिल्ला सजवून घे रे
ओठी जीवन तराणे !
कळी खळीत फुलणे !

पिल्ला पिल्ला कुणा न चुकले

कधीच मोठे होणे !

पिल्ला पिल्ला हे दिवस सुखाचे,

पुन्हा न बालपण येणे !

.
.
.
.

पुन्हा न बालपण येणे !

- **स्वाती फडणीस**

# ~~ भातुकली ~~

ते आंब्याचे  झाड  अन ती भातुकली
बालपणीची याद केवळ राहीली !

हुल्लड बाजी आट्या-पाट्यांची न उरली
दिवाळीतले  गायब किल्ले – घरकुलही
बाहुल्यांच्या लग्नी विहीणबाई न रूसे
शेंगदाणे चुरमु-यांची पंगत ना बसे

ते आंब्याचे  झाड  अन ती भातुकली
बालपणीची याद केवळ राहीली !

लॉलीपॉप न आता चिंच-गुळाचा
नसे पत्ताही गजरा - वेण्या - मैत्रीणींचा
प्रश्न नुरे मग बामगोळे चाखायाचा
झोके - बाग़ा - भेळपुरीही चापायाचा

ते आंब्याचे  झाड  अन ती भातुकली
बालपणीची याद केवळ राहीली !

चळत कुठे चमचमत्या हंडा घागरीची
पाळत कुठे आजोबांच्या करड्या नजरेची
राजाराणी हुकमी  एक्का कुणी न पीसे
ना अंगणही – शुक्र सप्तर्षी ओळखावे कसे

ते आंब्याचे  झाड  अन ती भातुकली
बालपणीची याद केवळ राहीली !

- सुप्रिया  जाधव



## ~~ ऐसे लहानपण ~~

केले होते उपद्व्याप असे काही
बोलूनही हजारदा मन कधी भरत नाही
केली होती फक्त एकदाच चोरी
शेजा रील काकूच्या झाडावरील आंब्याची
टाकली होती कूंपणाबाहेर काठी
पलिकडच्या त्या सुमीआजीची
पकडून जेव्हा सायकल दादाची
पळाले होते धुम्म घराबाहेर
फोडून घेतले तेव्हा दोन्ही ढोपर
रहावे लागले तासभर घराबाहेर
वाजवून जेव्हा बेल शेजा-यांची
दुरूनच आली होती हाक ऑळखीची
पाहिले होते तेव्हा बाबांनी पळताना
काजवे चमकले त्यांचे धपाटे खाताना
आठवते ती शाळेतली मस्ती आणि दंगा
घेतला होता वर्गातील मुलांशी पंगा
मैत्रीमधे केलेले भांडण आणि कट्टी
होते दमछाक आठवणीमागे पळताना
किती धावपळ उडाली भुतकाळामागे धावताना
आता परि न येती ते दिन बोलविता
आठव येता मुके काही भासते, रिक्त काही

\- **साक्षी**



## ~~ सानुली ~~

स्वप्नीचं पाखरू
अंगणात आलं
बहरल सारं
घरदार ||१||

नाजुक जिवणी
हसाया वळते
दृष्ट काढू वाटे
सानुलीची ||२||

इवलेसे हात
इवलेसे पाय
त्यांना घरदार
थिटे पडे ||३||

कुणाला कळेना
तुझी माझी भाषा
लेक आणि माय
जीवी एक ||४||

\- **अभय भावे**

## ~~ बालपण ~~

बालपण किती निरागस असत

हसर आणी बोलक असतं

बालपण किती रम्य असतं

तेव्हा सगळ क्षम्य असतं

बालपणीची भाषा बोबडी

त्यात कुठली आली लबाडी

बालपण किती पारदर्शी

नात नाही खोटेपणाशी

वाटल त्याला ठेवाव धरून

पण कळलच नाही, कधी गेलं निसटून

- **सुचेता आपटे**



## ~~ बालपण हरवल ~~

मायपाय माह्या पोरांच बालपण, बालपणातच हरवल ग
कंचे , भवरे, खुपरून्या मले त्यांच्याजवळ दिसत नाही ग

मायपाय माह्या पोरांच बालपण हरवल ग
कधी या घरा तो होमवर्क करताना दिसते ग

टॉक - टॉक चे आवाज मले ऐकूच येत नाही ग़
होमवर्क काय होत म्हणून घंट्या फक्त वाजतात ग

माह्या घरी कोनी भांडायला येत नाही
चिंचा , आवळे दगड मारून हे तोडत नाही

चिखलाचे भांडे हा बनवतच नाही ग
चिखल पाहून “शी||||||” म्हणे ग

आठवी – नववीत हे गर्लफ्रेंड बॉयफ्रेंडच्या गोष्टी करतात
कालेज पर्यंत मले माहित नवत प्रेम कायले म्हणतात

बंदिसाखली, विटी , तिग्गर हे माय खेल बंद झाले ग
घराघरातच बघ विडीओगेम आले ग

माय माह्या लेकराच बालपण हरवल ग
शाळा, अभ्यास , होमवर्क याच्याखाली दबून गेल ग

**राजेश जोशी**

## ~ मात्या – पित्याची लाभो ! ~~

होती कोणी सान बाहुली
मात-पित्याची प्यारी छकूली
निजण्यापूर्वी चुंबीन माथा
तोवरी पित्यास आराम कैसा ?

शाळेच्या रस्त्यावरस चलता
एक दुकानी मनी भरला
होता सुंदर मौक्तिक कंठा
अस्सलहूनही नक्कल सुबकसा

आई म्हणाली शिघ्र करोनी
देई माझ्या इवल्या काजा
पैसे सत्वर देईन बेटा
घेऊन ये तो सुरेख कंठा

बक्षिस मिळता काम करोनी
किती हुरळली, किती खिदळली
ज्याला त्याला दाखवी मिरवत
मिळकत आपुली कष्टार्जित ती

रोज पित्याने रात्री यावे
माथा चुंबून एक पुसावे
प्रेम मला तू करसी जर
तर हार मला तव दे ना राणी



तितुके सोडून काही बोला
पप्पा मजला इतुके बक्षा
बाहुली, खेळणी अथवा काही
कं ठा सोडून देईन जगही

असे सरकले कितीक दिन
मग एक दिनी तिज विचार आला
पप्पा माझे निजप्रेमाचे
देईन कंठा प्रिय जर त्यांना

पिता रात्री जव भेटीस आला
पप्पा घ्या हा हार तुम्हाला
माथा चुंबून बापाने मग
मखमली सुंदर बटवा दिधला

सुरेख अस्सल मौक्तिक कंठा
बटव्यांमध्ये होता दडला
आ नंदाने स्वर्ग ठेंगणा
गळा मिठीचा मधुर सोहळा

अस्सल जीवनी आम्हादेखील
देव मागतो प्रिय इवलेसे
लोभ सरो लव भौतिकतेचा
नकळे खजिना काय योजला??

- **प्रभा प्रभुदेसाई**



रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय. आमच्या रसिक वाचकांच्या ह्याच उत्स्फुर्त प्रतिसादामुळे नेटाक्षरीने मागल्याच आठवड्यात नाबाद ७५चा पल्ला गाठला. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५०००० हून अधिक मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

**ई-साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामूल्य ई-साप्ताहिके :**

ई-स्टाप, स्वरनेटाक्षरी ऑडियो अल्बम, बालनेटाक्षरी

**प्रसिध्द झालेली ई-बुक्स :**

टल्लीची शाळा, मकरंदच्या त्रिवेण्या, ग्रेव्हयार्ड लिटरेचर, चार क्षण, तो आणि ती, प्रियेचे अभंग

देशी दारुचे दुकान-3D, ई-शाळा, तो, मी आणि सिगरेट, मोरया, मीरा (अनुवाद) , लोकल गोष्टी

वरील ई-बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

esahity@gmail.com

नेटाक्षरीचा हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी व सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

netaksharee@gmail.com